**श्री.द.दि.कुलकर्णी, नियंत्रक, दूध परिवहन सेवा,वरळी यांचे समावेशन दुग्धव्यवसाय विकास विभागातील उप आयुक्त (दुग्धशाळा अभियांत्रिकी),आयुक्त दुग्धव्यवसाय विकास यांचे कार्यालय, वरळी या पदावर करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

शासन निर्णय क्रमांकः दुविप्र:-१०११/प्र.क्र.१९२/पदुम-६

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

दिनांक :- २५ सप्टेंबर,२०१४

**वाचा -**

१) शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग क्रमांक दुविआ-२००५/९१२/प्र.क्र.१९९/पदुम-६ दिनांक २५ मे,२००६.

२) शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग क्रमांक दुवियो२०१२/प्र.क्र.१०२/पदुम-९ दिनांक ३० ऑगस्ट,२०१४.

**प्रस्तावना -**

दुग्धव्यवसाय विकास विभागातील पदांच्या आढाव्याअंती दिनांक २५ मे,२००६ च्या शासन निर्णया अन्वये श्री.द.दी.कुलकर्णी हे नियंत्रक, दुध परिवहन सेवा, बृहन्मुंबई दूध योजना (वेतन श्रेणी रु.१५६००-३९१००,ग्रेड पे रु.७६००) या पदावर अतिरिक्त ठरविण्यात आले आहेत व सद्य:स्थितीत ते अधिसंख्य पदावर कार्यरत आहेत.

२. वित्त विभागाच्या दिनांक १०.९.२००१ च्या शासन निर्णयातील तरतूदीनूसार अतिरिक्त कर्मचा-यांची समकक्ष पदावर समावेशनाने केलेली नियुक्ती ही नियमित नियुक्ती समजली जाते. दुग्धव्यवसाय विकास विभागामध्ये उप आयुक्त संवर्गात मंजूर असलेले उप आयुक्त (दुग्धशाळा अभियांत्रिकी) व श्री.कुलकर्णी धारण करित असलेले " नियंत्रक" या दोन्ही पदांची वेतने श्रेणी समान आहे. तसेच दुग्धव्यवसाय विभागातील अभियांत्रिकी गटाच्या दिनांक १२.१२.१९८९ च्या अधिसुचनेव्दारे विहित केलेल्या सेवाप्रवेश नियमातील ३ (सी) नुसार श्री. कुलकर्णी यांची शैक्षणिक अर्हता व अनुभव हा " उप आयुक्त (दुग्धशाळा अभियांत्रिकी)" या पदाकरिता यथायोग्य असल्याने श्री.द.दि.कुलकर्णी यांचे दुग्धव्यवसाय विभागातील "उप आयुक्त (दुग्धशाळा अभियांत्रिकी)" या पदावर समावेशन करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय-**

शासनाच्या उच्चस्तरीय सचिव समितीच्या मान्यतेने दिनांक ३०.८.२०१४ च्या शासन निर्णयान्वये दुग्धव्यवसाय विकास विभागाचा सुधारित आकृती बंद मंजूर करण्यात आला आहे. त्यामध्ये "उप आयुक्त (दुग्धशाळा अभियांत्रिकी)" या पदाचा समावेश आहे. सबब, श्री. द. दि. कुलकर्णी, नियंत्रक यांचे समावेशनाकरीता दुग्ध व्यवसाय विकास विभागामध्ये "उप आयुक्त (दुग्धशाळा अभियांत्रिकी)" हे समकक्ष पद उपलब्ध असल्याने, त्याच प्रमाणे श्री.कुलकर्णी हे सदर पदावरील विभागाच्या दिनांक

१२.१२.१९८९ च्या सेवाप्रवेश नियमामधील शैक्षिणिक व अनुभवाच्या अटींची तसेच वित्त विभागाच्या दिनांक १०.९.२००१ च्या

शासन निर्णयामध्ये नमूद शर्तीची पूर्तता करीत असल्याने श्री.द.दि.कुलकर्णी यांचे समावेशन दुग्धव्यवसाय विकास विभागातील "उप आयुक्त (दुग्धशाळा अभियांत्रिकी)" (वेतन श्रेणी रु.१५६००-३९१००, ग्रेड पे रु.७६००) या समकक्ष पदावर करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

२. श्री.द.दि.कुलकर्णी, यांच्या उपरोक्त समावेशनास वित्त विभाच्या दिनांक १०.९.२००१ व २९.३.२००४ च्या शासन निर्णयामधील तरतूदी लागू राहातील.

३. श्री.द.दि.कुलकर्णी यांना "उप आयुक्त( दुग्धशाळा अभियांत्रिकी)" या पदावर तात्काळ रुजू करुन घेण्यात यावे.

४. श्री. द. दि. कुलकर्णी यांच्या उपरोक्त समावेशनास वित्त विभागाची सहमती त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२९५/वि.सू.-१ दि.३.०८.२०११ अन्वये घेण्यात आली आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०९२५१२४४३७२६०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sathe Shashank M

Digitally signed by Sathe Shashank M
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Agri & ADF, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sathe Shashank M
Date: 2014.09.25 12:57:12 +05'30'

(श.मा.साठे)

शासनाचे उप सचिव

**प्रति,**

१) महालेखापाल-१ (लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई.
२) सचिव (पदुम), कृषि व पदुम विभाग मंत्रालय, मुंबइ-४०० ०३२.
३) उप सचिव, वित्त विभाग (वि. सु. -१), मंत्रालय, मुंबई - ३२.
३) आयुक्त, दुग्धव्यवसाय विकास, महाराष्ट्र राज्य, मुंबई-३२.रळी,मुंबई-४०० ०१८.
४) उप आयुक्त (दुग्धशाळा अभियांत्रिकी), आयुक्त, दुग्धव्यवसाय विकास यांचे कार्यालय, वरळी, मुंबई-४०० ०१८.
५) अधिदान व लेखाधिकारी, वांद्रे, मुंबई.
६) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
७) श्री. द. दि. कुलकर्णी, नियंत्रक, दुध परिवहन सेवा, बृहन्मुंबई दूध योजना, वरळी, मुंबई- ४०० ०१८.
८) निवडनस्ती (पदुम-६)